**एकाच लेखाशिर्षाखालील (CRC) सर्व पूरक मागण्यांचे प्रस्ताव एकत्रितरित्या वित्त विभागास सादर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : पूरक-२०१८/प्र.क्र.१४३/अर्थ-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ३१ डिसेंबर, २०१८.

**परिपत्रक :-**

मंत्रालयीन विभागांच्या अधिनस्त कार्यासनांमध्ये एकाच लेखाशिर्षाशी संलग्न असलेली वेगवेगळी कार्यासने आहेत. त्यामुळे एकाच लेखाशिर्षाखाली या वेगवेगळया कार्यासनांकडून वेगवेगळे पुरवणी मागणीचे प्रस्ताव सादर होतात. त्याचप्रमाणे एका लेखाशिर्षाखाली पुरवणी मागणी प्रस्ताव सादर झाल्यानंतर त्याच लेखाशिर्षाखाली नव्याने प्रशासकीय मान्यता दिलेली कामे अर्थसंकल्पित करण्यासाठी अथवा त्याच लेखाशिर्षाखाली अतिरिक्त नियतव्यय मंजूर करण्यासाठी वेगवेगळया रकमेचे पुरवणी मागणी प्रस्ताव सादर केले जातात, असे आढळून आले आहे.

२. एखाद्या विभागाच्या अधिनस्त एका कार्यासनाकडून प्राप्त झालेल्या पूरक मागणीच्या प्रस्तावांवर वित्त विभागाच्या व्यय कार्यासनाकडून अभिप्राय देऊन झाल्यावर त्याच लेखाशिर्षाखाली त्या विभागाच्या अन्य कार्यासनाचा पूरक मागणीचा प्रस्ताव वा वरीलप्रमाणे अन्य रकमेचे पुरवणी मागणी प्रस्ताव सादर होतात. त्यामुळे उपलब्ध निधी व संबंधित विभागास पूरक मागणीव्दारे उपलब्ध करुन द्यावयाचा निधी याची परिगणना करताना चूक होण्याची अथवा एकाच लेखाशिर्षाखाली दोन बाबी / पूरक मागण्या होण्याची शक्यता असते.

३. त्यामुळे यापुढे विभागांनी एकाच लेखाशिर्षाखालील सर्व पूरक मागणीचे प्रस्ताव एकत्र करुन मगच वित्त विभागास सादर करावेत. जेणेकरुन पूरक मागणीव्दारे निधी उपलबध करुन देण्याबाबत अचूक निर्णय घेता येईल. याकरिता पूरक मागणीचे प्रस्ताव संबंधित विभागाच्या संबंधित अर्थसंकल्प शाखेमार्फत सादर करण्यात यावेत.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०१०११६४६३०३७०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Narayan Mali

Digitally signed by Ravindra Narayan Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa8f1ecdaf4f4b4f47995610b770072fda7e71844e4ff45f11c786239f624b0a, cn=Ravindra Narayan Mali
Date: 2019.01.01 16:55:43 +05'30'

**( र.ना.माळी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
३. प्रधान सचिव/सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. सह सचिव/उप सचिव (अर्थसंकल्प) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सह सचिव/उप सचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्यमंत्री याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), प्रधान सचिव (ले.वको.), प्रधान सचिव (वि.सु.) सचिव (व्यय) वित्त विभआग यांचे वरीष्ठ/स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (अर्थ-३).